**अंतिम सुधारीत अनुदान- वर्ष २०१०-२०११.**
**नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था)**
**पाणीपुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी**
**सहाय्यक अनुदान.**
**लेखाशीर्ष वाय-२, २२१५, (२२१५ ८९७३)**
**भारित.**
**----------------------------------------**

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-२०११/भारित/प्र.क्र.१५५/पापु-२४
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ३१ मार्च, २०११.

**प्रस्तावना :-**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक वाय-२, २२१५, राज्य योजना- नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ ८९७३) भारित, या लेखाशीर्षाखाली, रुपये ०७,००,०००/- (रुपये सात लाख फक्त) इतकी मुळ अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. **मात्र सुधारीत अर्थसंकल्पीय अंदाजानुसार रुपये ०६,३०,०००/- (रुपये सहा लाख तीस हजार फक्त) इतकी तरतूद मंजूर करण्यात आली आहे.**

**शासन निर्णय :-**

नागरी पाणी पुरवठा योजनासाठी जमिनीचे भूसंपादन करण्यात येते. या भूसंपादनाकरीता संबंधीतांना भूसंपादनापोटी आर्थिक मोबदला अदा करावा लागतो. आर्थिक मोबदल्यानिमित्ताने जर एखाद्या व्यक्तीने मा.न्यायालयामध्ये दावा दाखल केल्यास मा. न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने किंवा या दाव्याच्या न्यायालयीन निर्णयानुसार भूसंपादनापोटी अदा करावयाची रक्कम **"भारित"** या खर्चाखाली अदा करावी लागते. अशा भविष्यातील संभाव्य बाबी लक्षात घेता या रक्कमेची अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. नागरी पाणी पुरवठा योजनानिमित्ताने भूसंपादनापोटी न्यायालयीन निर्णयानुसार अदा करावयाची रक्कम ही उपरोक्त नमूद लेखाशीर्षाखाली महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत संबंधीतांना अदा करण्यात येते.

२. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षामध्ये मा.न्यायालयाचे निर्णयानुसार भूसंपादापोटी कोणत्याही क्षेत्रीय यंत्रणेकडून मागणी न आल्याकारणाने भारित खर्चाची रक्कम वितरीत करावयाची नसल्यामुळे सुधारीत अर्थसंकल्पीय अंदाजानुसार रुपये ०६,३०,०००/- (रुपये सहा लाख तीस हजार फक्त) इतकी रक्कम कक्ष अधिकारी, पापु-०४ यांना दिनांक २९ मार्च, २०११ रोजीच्या पत्रान्वये प्रत्यार्पित करण्यात आली आहे. **परिणामी या उपलेखाशीर्षाखाली अंतिम सुधारीत अंदाज "निरंक" आहे.**

(कृपया मागे पहावे.)

३. सदर अनुदान हे न्यायालयीन निर्णयानुसार वितरीत करावयाचे असते. मात्र कोणत्याही क्षेत्रीय यंत्रणांना अनुदान अंतिमत: मंजूर व वितरीत करण्यात आलेले नाही. याबाबत मंजूर व वितरीत अनुदानाबाबतच्या वाटपाची वस्तुस्थिती सोबतच्या विवरणपत्रात दर्शविण्यात आली आहे.

४. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०३३११६१७३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्स्प्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
२) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी. जी. ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०००२०.
३) महालेखापाल, महाराष्ट्र- २, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर- ४४०००१
४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई - ४००६१४. (पाच जादा प्रतींसह )
५)प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण. (सर्व)
६)अधीक्षक अभियंता (मध्यवर्ती नियोजन, संकल्पचित्र व संनियंत्रण कक्ष), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, दुसरा मजला,एस.टी.पी. कंपाऊंड, कन्हैया नगर जवळ, कोपरी कॉलनी, ठाणे (पूर्व), जि. ठाणे. पीनकोड-४००६०३
७) अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
८)निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय इमारत, सातवा मजला, वांद्रे - कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०००५१
९)वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय- ३, बीयुडी- १८, अर्थोपाय मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१०) नियोजन विभाग, कार्यासन क्रमांक १४४३ मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
११)पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,०९,१३,१७,१८,२०,२२ मंत्रालय, मुंबई -४००३२.
१२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१३) निवड नस्ती, पापु-२४

---

शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-२०११/भारित/प्र.क्र.१५५/पापु-२४ दिनांक ३१ मार्च, २०११
सोबतचे विवरणपत्र.

**विवरणपत्र.**

(रुपये)

| अ. क्र. | आर्थिक लेखाशीर्ष | वर्ष २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील मूळ अर्थसंकल्पीय तरतूद | वर्ष २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूद | अंतिमत: मंजूर व वितरीत अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, १९१, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य-राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहायक अनुदान. (२२१५ ८९७३) ५० इतर खर्च, भारित ३१,सहाय्यक अनुदान (वेतनेतर) | ०७,००,००० | ०६,३०,००० | **निरंक** |
| | **एकूण** | ०७,००,००० | ०६,३०,००० | **निरंक** |

**(वि.गो.औगड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

***************************______________________________***************
****************************************************************

E:\CR- 155 2215 8973 Note & G.R. FMG..doc